**मौ. नेरळे ता. पाटण, जि. सातारा येथे कोयना नदीवर घाट व पूर संरक्षक भिंत बांधण्यास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-२०१६/ (प्र.क्र. ५५३/२०१६)/ सिं.व्य.(महसूल)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: ०५ जुलै, २०१७.

**वाचा :** १) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. मकृखोविमं/३०/(८३१/२०१६)/प्रशा-४/४५५६/२०१६, दि. २३.११.२०१६.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत मौ. नेरळे हे गांव कोयना नदीच्या उजव्या तीरावर वसलेले आहे. कोयना नदीमध्ये पूरनियंत्रण कालावधीमध्ये कोयना धरणातून नदीपात्रात सोडण्यात येणाऱ्या पाण्यामूळे गावालगतच्या पायऱ्यांचा घाट व शेजारील जमीन खचत गेल्यामूळे नदीपात्र बदलण्याची शक्यता आहे. त्यामूळे गावातील जिवीत व वित्त हानी टाळण्यासाठी सदर कामाची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी व ग्रामपंचायत नेरळे, ता. पाटण, जि. सातारा यांनी ठराव क्र. ३ , दि. २०.८.२०१६ नुसार केलेली आहे. सदर बाब विचारात घेता मौ. नेरळे येथे कोयना नदीवर घाट व पूरसंरक्षक भिंत बांधण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत मौ. नेरळे ता. पाटण, जि. सातारा येथे कोयना नदीवर घाट व पूरसंरक्षक भिंत बांधण्याच्या कामासाठी रू. ७५,१६,९७०/- व अनुषंगिक खर्च रू. ८,२६,८६७/- अशा एकूण रू. ८३,४३,८३७/- (रू. त्र्याऐंशी लक्ष त्रेचाळीस हजार आठशे सदतीस फक्त) एवढया खर्चाच्या किंमतीस खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) शासन परिपत्रक क्र.एफडीडब्ल्यु-१०९२/(१७०)/सिं.व्य.(कामे), दि.७.८.१९९२ नुसार कार्यवाही करावी.

ब) काम सुरु करण्यापूर्वी दि. ७.८.१९९२ च्या शासन परिपत्रकातील तरतूदीनुसार मौ. नेरळे, ता. पाटण यांनी मंजुर केलेल्या ठरावाप्रमाणे १०% लोकवर्गणीची रक्कम भरणे बंधनकारक राहील.

क) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/ संकल्पने, दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

ड) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे.

इ) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधीतांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची दक्षता घ्यावी.

प) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल याची दक्षता नियोजनात घ्यावी.

फ) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक भिंत मौ. नेरळे, ता. पाटण ग्रामपंचायतीने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दूरूस्ती करावयाची आहे. काम सुरु करण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र मौ. नेरळे ग्रामपंचायतकडून प्राप्त करून घ्यावे.

ज) सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च "४७११ पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे भागभांडवली अंशदान (४७११ ०२०९)" या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ११/सन २०१७-१८ वर नोंदविण्यात आलेली आहे.

प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०५१६४६०३९०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2d4c9d30f88b6a2745465552d3374 3e7c967f8c7a5d287520a1c61013a9d322a, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2017.07.05 16:46:52 +05'30'

( सं. अ. टाटू )
शासनाचे उपसचिव

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,

३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई

४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,

५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,

७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,

८) प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

९) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०) महालेखापाल-१ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

११) महालेखापाल-२ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे,

१३) मुख्यअभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, पुणे

१४) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१५) अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली,

१६) कार्यकारी अभियंता, टेंभू उपसा सिंचन प्रकल्प व्यवस्थापन विभाग, ओगलेवाडी,

१७) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.